महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-ब मधील
सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)
पदाच्या सेवाप्रवेश नियमात सुधारणा

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एमएससी -१००८/(७३/२००८)/आ(संनि)
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दिनांक :- ८ जुलै २००९

निर्णय :-

महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट 'ब' मधील सहाय्यक अभियंता (स्थापत्य) श्रेणी-२ पदाच्या १६ जून, १९९७ रोजी संविधानाच्या अनुच्छेद-३०९ अंतर्गत प्रसिध्द केलेल्या सेवाप्रवेश नियमामध्ये करावयाची सुधारणा सोबतच्या अधिसूचनेत (इंग्रजी व मराठी) दर्शविल्याप्रमाणे शासन विहित करीत आहे.

२. उपरोक्त अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या असाधारण राजपत्रात स्वतंत्ररित्या प्रसिध्द करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

सांकेतांक क्रमांक २००९०७०८१५५७०५००१

( व्यं. वि. गायकवाड )
सचिव (जलसंपदा)

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई.
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (बांधकाम)/ सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, संकल्पन प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
महासंचालक, जल व भूमि व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व महामंडळाचे कार्यकारी संचालक.
मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता.
व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई (पत्राने).
स्वीय सहायक, मा. मंत्री (जलसंपदा) / मा. मंत्री (कृष्णा खोरे) / मा. मंत्री (खारभूमी) / मा. राज्यमंत्री (जलसंपदा).
सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
जलसंपदा विभागातील सर्व आस्थापना कार्यासने.
आ (संनि) कार्यासन संग्रहार्थ.

***NOTIFICATION***

Water Resources Department ,
Mantralaya, Mumbai - 400 032.
Dated the 8th July, 2009.

**Constitution of India.**

NO.MSC-1008/(73/2008)/E(CR) :- In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules to amend the Assistant Engineers' (Civil), Grade II, in the Maharashtra Service of Engineers, Group B (Recruitment) Rules, 1997, namely:-

1. These rules may be called the Assistant Engineers' (Civil), Grade II, in the Maharashtra Service of Engineers, Group B (Recruitment) (Amendment) Rules, 2009.
2. In the Assistant Engineers' (Civil), Grade II, in the Maharashtra Service of Engineers, Group B (Recruitment) Rules, 1997 (hereinafter referred to as "the principal Rules"), for the words " Irrigation Department", wherever they occurs, the words "Water Resources Department" shall be substituted.
3. In the principal Rules, for rule 8, the following rule shall be substituted, namely:-

"8. Notwithstanding anything contained in rule 3, the appointments made to the posts till the 16th June 1997, shall be regularised in the following manner, namely: -

*(a)* The persons appointed on regular basis during the period from the 2nd April 1981 to the 16 th April 1984 to the post of Graduate Junior Engineers (Class-III ) either through the State Selection Board or from the

candidates who have given bonds for serving in Government service as per the then prescribed procedure for appointment, shall have to pass *viva-voce* test that shall be the qualifying examination, to be held by the Commission during the period 2009–2010 or immediately thereafter, to enable them to be absorbed in the cadre of Assistant Engineer, Grade II (Junior Gazetted Class-II), created for Graduate Junior Engineers *vide* Government Resolution, Irrigation Department, No. CDS 1582 / 158(215) / EST-(10), dated the 16th April 1984.

*(b)* The Diploma holder Junior Engineers regularly appointed in Class-III post and who have obtained A.M.I.E. (Equivalent to B.E. Degree) or B.E. Degree while in service have been given benefit of 3/8th of service rendered as Junior Engineer, during the period from the 1st April 1981 to 16th June 1997, in the light of the provisions of the Government Resolution, Irrigation Department, No. S.L.S. 2681/1273/(500)/ EST (8), dated the 29th November 1984. Such persons shall have to pass *viva-voce* test that shall be the qualifying examination, to be held by the Commission during 2009–2010 or immediately thereafter, to enable them to be absorbed in the cadre of Assistant Engineer, Grade II, *vide* Government Resolution, dated the 16th April 1984.

*(c)* Services of persons appointed on temporary basis to the post of Assistant Engineer, Grade II, during the period from the 17 April 1984 to 31st December 1996 and who have already qualified in *viva voce* test held by the Commission from the 7th August 1997 to 2nd September 1997 and those who have qualified in the combined competitive examination held

by the Commission during the period from the 12th December 1998 to 13th December 1998 shall be regularised in the cadre of Assistant Engineer, Grade-II, from the date of their initial appointment in the cadre of Assistant Engineer, Grade-II.

*(d)* The persons appointed during this period from 17 th April 1984 to 31st December 1996, and not qualified in the above said *viva-voce* test or Combined Competitive Examination as the case may be held by the Commission shall have to pass in the viva-voce test to be held by the Commission during the period 2009–2010 or immediately thereafter, to enable them to get regularized in the cadre of Asstt. Engineer, Grade- II.

*(e)* Persons who do not pass in such *viva-voce* test shall be given second opportunity to appear for the *viva-voce* test to be held by the Maharashtra Public Service Commission, to enable them to get their services regularized in the cadre of Assistant Engineer, Grade-II.

*(f)* The persons who do not pass in the second attempt shall be given one more opportunity by way of last chance to appear for the *viva-voce* test to be held by the Maharashtra Public Service Commission, to enable them to get their services regularized in the cadre of Assistant Engineer, Grade-II.

*(g)* The services of persons mentioned in clauses (*a), (b), (d), (e)* and *(f)* of this rule, who pass in the *viva-voce* test to be held by the Commission during the period 2009-2010 or immediately thereafter, shall be regularised in the cadre of Assistant Engineer, Grade II, from the date of their initial appointment either in the cadre of Graduate Junior Engineers or Assistant Engineer, Grade-II.

(*h*) The persons who do not pass viva-voce as provided in the clause (*f*), their services as Assistant Engineer, Grade-II, shall be terminated:

Provided that, if such persons give an undertaking to the effect that, they are ready to get absorbed in the cadre of Junior Engineer, Group B (Non Gazatted) (which is below that of Assistant Engineer, Grade II) with the placement at the bottom of the seniority list of the particular year in which *viva-voce* test is held, then such persons shall be absorbed in that cadre.

(*i*) The persons who were appointed during the period from 2nd April 1981 to 16 th June 1997 and who have either retired on superannuation or voluntarily retired or left the above referred post for any other reasons, shall be deemed to be regularised in the cadre of Assistant Engineer, Grade-II.

(*j*) The seniority of such persons except those who have passed combined Competitive Examination mentioned in clause *(c)and the persons mentioned in clause (d),* shall be fixed in the cadre of Assistant Engineer, Grade II, as per the provisions in the first proviso to sub-rule *(1)* of rule 4 of the Maharashtra Civil Services (Regulation of Seniority) Rules, 1982 and the seniority of such persons mentioned in clause *(d)* shall be fixed at the bottom of the directly recruited batch joined in the year 2001.

By order and in the name of the
Governor of Maharashtra,

( V.V.Gaikwad )
Secretary to Government.

## जलसंपदा विभाग

मंत्रालय, मुंबई ४०००३२, दिनांक ८ जुलै, २००९

### भारताचे संविधानः

क्रमांक एमएससी १००८/(७३/२००८)/आ (संनि) -- भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल, याद्वारे, महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट-ब मधील सहाय्यक अभियंता (स्थापत्य) श्रेणी-२ (सेवाप्रवेश) नियम १९९७ या नियमामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करीत आहेत :-

१. या नियमांना, महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट-ब मधील सहाय्यक अभियंता (स्थापत्य) श्रेणी-२ (सेवाप्रवेश) (सुधारणा) नियम, २००९ असे संबोधण्यात यावे.

२. महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट-ब मधील सहायक अभियंता (स्थापत्य) श्रेणी-२ (सेवाप्रवेश) नियम, १९९७ मध्ये (यात यापुढे ज्याचा निर्देश मुख्य नियम असा उल्लेख करण्यात आला आहे.) जेथे “पाटबंधारे विभाग” असे शब्द आलेले आहेत, तेथे “जलसंपदा विभाग” असे शब्द समाविष्ट करण्यात येतील.

३. मुख्य नियमातील नियम ८ वगळून त्याऐवजी पुढील नियम समाविष्ट करण्यात येईल. “ ८. नियम ३ मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी दिनांक १६ जून, १९९७ पर्यंत या पदावर केलेल्या नियुक्त्या खालील पध्दतीने विनियमित करण्यात येतील” :-

(ए) दिनांक २.४.१९८१ ते दिनांक १६.४.१९८४ या कालावधीत पदवीधर कनिष्ठ अभियंता (वर्ग-३) या पदावर त्यावेळी नियुक्तीसाठी विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार राज्यनिवड मंडळाकडून किंवा शासकीय सेवेत काम करण्याचे बंधपत्र देऊन नियुक्त झालेल्या उमेदवारांना शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र.सीडीएस-१५८२/१५८(२१५)/इएसटी-१०, दि.१६.४.१९८४ अन्वये पदवीधर कनिष्ठ अभियंत्याकरिता निर्माण केलेल्या सहायक अभियंता श्रेणी-२ (कनिष्ठ राजपत्रित वर्ग-२) या संवर्गात सामावून घेण्याकरिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सन २००९-२०१० हया वर्षामध्ये किंवा त्यानंतर लगेचच घेतली जाणारी तोंडी अर्हता परीक्षा उत्तीर्ण करावी लागेल.

(बी) पदविकाधारक कनिष्ठ अभियंता या वर्ग-३ मधील पदावर नियमितरित्या नेमणूक झालेल्या ज्या अभियंत्यांनी शासन सेवेत असतांना ए.एम.आय.ई. (बी.ई. पदवीशी समकक्ष) किंवा बी.ई. पदवी प्राप्त केली आहे, त्यांना शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्र.एसएलएस-२६८१/१२७३/(५००)/इएसटी-८, दि.२९.११.१९८४ मधील तरतुदीनुसार पदविकाधारक अभियंता म्हणून केलेल्या एकूण सेवेपैकी ३/८ सेवेचा लाभ दि.१.४.१९८१ ते दि.१६.६.१९९७ या कालावधीत देण्यात आलेला आहे अशा व्यक्तींना दि.१६.४.१९८४ अन्वये निर्माण केलेल्या सहायक अभियंता श्रेणी-२ या संवर्गात समावेशनासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगातर्फे सन २००९-२०१० या वर्षामध्ये किंवा त्यानंतर लगेचच घेतली जाणारी तोंडी अर्हता परीक्षा उत्तीर्ण करावी लागेल.

(सी ) दि.१७.४.१९८४ ते दि.३१.१२.१९९६ या कालावधीत सहायक अभियंता श्रेणी-२ या पदावर तात्पुरत्या स्वरुपात नियुक्त झालेल्या आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दि.७.८.१९९७ ते दि.२.९.१९९७ या काळात घेतलेल्या तोंडी परिक्षांमध्ये अर्हता प्राप्त केली आहे अशा आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दि.१२.१२.१९९८ ते दि.१३.१२.१९९८ या कालावधीत घेतलेल्या संयुक्तीक स्पर्धात्मक परिक्षेमध्ये अर्हता प्राप्त केली आहे अशा सहायक अभियंता श्रेणी-२ यांच्या सेवा सदर संवर्गात त्यांच्या मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून नियमित करण्यात येतील.

(डी) दि. १७.०४.१९८४ ते दि. ३१.१२.१९९६ या कालावधीत नियुक्त झालेल्या आणि आयोगाने प्रकरणपरत्वे घेतलेल्या उपरोक्त तोंडी परिक्षा किंवा एकत्रित स्पर्धात्मक परिक्षेमध्ये अर्हता प्राप्त न केलेल्या उमेदवारांना सहायक अभियंता श्रेणी-२ या संवर्गात त्यांच्या सेवा नियमित होण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सन २००९-२०१० मध्ये किंवा त्यानंतर लगेचच घेतल्या जाणाऱ्या तोंडी परिक्षेमध्ये उत्तीर्ण व्हावे लागेल.

(ई) तोंडी परीक्षेमध्ये उत्तीर्ण न होणाऱ्या व्यक्तींना सहायक अभियंता श्रेणी-२ या संवर्गात त्यांच्या सेवा नियमित होण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेतल्या जाणा-या तोंडी परीक्षेसाठी दूसरी संधी देण्यात येईल.

(एफ ) ज्या व्यक्ती दुस-या संधीत उत्तीर्ण होऊ शकणार नाहीत, त्यांना त्यांची सहायक अभियंता श्रेणी-२ या संवर्गात सेवा नियमित होण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेतल्या जाणाऱ्या तोंडी परिक्षेला बसण्यासाठी आणखीन एक शेवटची संधी देण्यात येईल.

(जी) या नियमाच्या उपनियम (ए)(बी)(डी)(ई) व (एफ ) मध्ये नमूद केलेल्या ज्या व्यक्तींनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सन २००९-२०१० मध्ये किंवा त्यानंतर लगेचच घेतल्या जाणाऱ्या तोंडी परीक्षेमध्ये अर्हता प्राप्त केली असेल त्यांची सहायक अभियंता श्रेणी-२ या संवर्गातील सेवा त्यांच्या पदवीधर कनिष्ठ अभियंता किंवा सहायक अभियंता श्रेणी-२ संवर्गातील त्यांच्या मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून नियमित करण्यात येईल.

(एच) ज्या व्यक्ती उपनियम (एफ ) मधील तरतूदीनुसार शेवटच्या संधीतही तोंडी परिक्षा उत्तीर्ण होणार नाहीत, त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

परंतु, त्यांनी कनिष्ठ अभियंता, गट ब (अराजपत्रित) या (सहाय्यक अभियंता श्रेणी-२ पेक्षा निम्न स्तरावरील) संवर्गात समावेशन करुन त्यांची ज्येष्ठता या संवर्गात संबंधित परिक्षेच्या वर्षाच्या ज्येष्ठता यादीत सर्वात शेवटी निश्चित करण्याबाबतचे हमीपत्र दिल्यास त्यांना त्या संवर्गात सामावून घेण्यात येईल.

(आय) दि.२.४.१९८१ ते दि.१६.६.१९९७ या कालावधीत नियुक्त झालेली जी व्यक्ती नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त किंवा स्वेच्छानिवृत्त झालेली असेल किंवा अन्य कारणास्तव अशा व्यक्तीने उपरोक्त पद सोडले असेल, तर अशा व्यक्तींची सेवा, सहायक अभियंता श्रेणी-२ संवर्गात नियमित झाल्याचे समजण्यात येईल.

(जे) वरील उपनियम (सी) मधील संयुक्तीक स्पर्धात्मक परिक्षेमध्ये अर्हता प्राप्त केलेल्या व्यक्ती आणि उपनियम (डी) मध्ये नमूद व्यक्ती वगळता वरीलपमाणे अन्य अर्हता प्राप्त व्यक्तींची ज्येष्ठता, सहायक अभियंता श्रेणी-२ संवर्गात, महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम १९८२ मधील नियम ४(१) च्या पहिल्या परंतुका मधील तरतूदीनुसार निश्चित करण्यात येईल व उपनियम (डी) मध्ये नमूद व्यक्तींची ज्येष्ठता सन २००१ मध्ये सरळसेवा भरतीने नियुक्त झालेल्या तुकडीच्या शेवटी निश्चित करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( व्यं. वि. गायकवाड)
शासनाचे सचिव,